**श्री.एम.व्ही.आकरे यांचे सहनिबंधक सहकारी संस्था या सवंर्गातून अपर निबंधक सहकारी संस्था गट-अ या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने दिलेल्या पदस्थापनेच्या पदनामाबाबतचे सुधारीत आदेश**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन आदेश क्रमांक - राजस-२०२४/प्र.क्र.६३/५स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १२ जून, २०२४

**वाचा-** १. समक्रमांक दि.२२/११/२०२३ रोजीचे आदेश.
२. शासन निर्णय क्र.राजस-२०२४/प्र.क्र.६३/५-स, दि.२४/०४/२०२४

**प्रस्तावना-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दि.१५/९/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये अपर निबंधक, सहकारी संस्था व इतर ३ संवर्गाचे संख्याबळ निश्चित करताना महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या., पुणे या महामंडळामध्ये प्रतिनियुक्तीने सहव्यवस्थापकीय संचालक तथा अपर निबंधक हे अपर निबंधक या संवर्गातील पद निश्चित करण्यात आले. त्यानुसार श्री. मिलिंद आकरे, व्यवस्थापकीय संचालक तथा सहनिबंधक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या., पुणे यांना शासनाच्या वाचा क्र.१ येथील आदेशान्वये अपर निबंधक, सहकारी संस्था या पदावर पदोन्नती देण्यात येऊन त्यांची पदस्थापना **"सहव्यवस्थापकीय संचालक तथा अपर निबंधक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या., पुणे"** या पदावर करण्यात आली.

तथापि श्री.मिलिंद आकरे यांनी दि.२३/११/२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास असे कळविले की, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ, पुणे हि कंपनी कायद्यांतर्गत नोंदणी झालेली कंपनी असून शासनाने नियुक्त केलेले व्यवस्थापकीय संचालक हे पदसिध्द संचालक म्हणून काम पाहतील. त्यानुसार महाराष्ट्र सहकार विकास महामंडळात व्यवस्थापकीय संचालक म्हणून नियुक्तीबाबत उचित आदेश व्हावेत. उक्त विनंतीच्या अनुषंगाने दि.१५/०९/२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्ट-अ मधील अपर निबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गातील प्रतिनियुक्तीच्या पदामधील क्र.९ चे पद **"सहव्यवस्थापकीय संचालक तथा अपर निबंधक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या., पुणे"** या पदनामाऐवजी **"व्यवस्थापकीय संचालक तथा अपर निबंधक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या., पुणे"** अशी सुधारणा करण्यास सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दि.२४/०४/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार श्री. आकरे यांच्या दि.२२/११/२०२३ रोजीच्या आदेशामधील पदोन्नतीच्या पदनामामध्ये सुधारणा करुन नव्याने सुधारीत आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या आस्थापनेवरील सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ (वेतनश्रेणी एस-२३ रु.६७७००-२०८७००) या संवर्गातून अपर निबंधक सहकारी संस्था गट-अ (एस-२७ रु. ११८५००-२१४१००) या वेतनश्रेणीत सन २०२२-२०२३ च्या नियमित निवडसूचीमध्ये ज्येष्ठतेनुसार रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येऊन पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना अपर निबंधक

सहकारी संस्था गट-अ या पदावर करण्यात आली होती. तथापि सदर पदाच्या पदनामामध्ये वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये शासनाने मान्यता दिल्यानुसार बदल करण्यात आला. त्यानुसार वाचा क्र.१ .येथील शासननिर्णयातील पदस्थापनेच्या पदनामामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | दि.२२/११/२०२३ रोजीच्या आदेशातील पदनाम | सुधारीत पदनाम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.एम. व्ही. आकरे | सहव्यवस्थापकीय संचालक तथा अपर निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी विकास महामंडळ, पुणे. | व्यवस्थापकीय संचालक तथा अपर निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी विकास महामंडळ, पुणे. |

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.com या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०२४०६१२१८२८४०६१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANTOSH PUNAMCHAND KHORGADE

Digitally signed by SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=c0546acca372ce2d8edbe5dc7949386daf8955a34dfda38bf6f34ce12b899ea7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=08CF3286085F1309FD153E0C9A31F18D1C3CE4865E7DF75B4F8AA7B75A9A81EA, cn=SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
Date: 2024.06.12 18:42:05 +05'30'

**( सं. पु. खोरगडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३.पणन संचालक, पणन संचालानालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४.आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
५.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन व लेखापरिक्षण), व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६.सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था / सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, व्दारा- सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
७.महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता).
८.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९. श्री.एम. व्ही. आकरे, व्यवस्थापकीय संचालक तथा सहनिबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी विकास महामंडळ, पुणे.
१०.मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२.मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३.मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक.
१४.मा.सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक.
१५. निवड नस्ती (कार्यासन-५-स).